(१४ पैकी शासन निर्णय क्र.११)

**फौजदारी खटल्यातील सिध्दापराध प्रमाण वाढविण्यासाठी उपाययोजना करण्याबाबत.**

**राज्यातील न्यायसहाय्यक वैज्ञानिक प्रयोगशाळा सक्षमीकरणासाठी समिती गठीत करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : डीपीपी-२०१२/प्र.क्र.१०/पोल-१०**

**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, दुसरा मजला,**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**

**दिनांक : १२ मे, २०१५**

**प्रस्तावना :-**

न्यायालयामध्ये दाखल करण्यात आलेल्या खटल्यात गुन्हा शाबित करण्याकरिता सबळ व कायद्याच्या कसोटीवर टिकणा-या पुराव्यांची आवश्यकता असते. तपासामध्ये तपासीअधिकारी यांनी सादर केलेले पुराव्याला शास्त्रोक्त जोड न मिळाल्याने असे पुरावे कुचकामी ठरतात. राज्यातील न्याय सहाय्यक वैज्ञानिक शाळांमार्फत तपासणी करुन घेतलेले गुन्हयातील पुरावे कधी कधी तांत्रिक कारणास्तव निरुपयोगी ठरतात. या सर्व बाबींचा प्रतिगामी परिणाम होऊन दोषारोपसिध्दीचे प्रमाणे घटत असल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आली आहे. सबब दोषारोपसिध्दीचे प्रमाण वाढविण्याच्या दृष्टीकोनातून राज्यातील न्याय सहाय्यक वैज्ञानिक प्रयोगशाळा अत्याधुनिक व अधिक सक्षम करण्यासाठी उपाययोजना करण्याच्या अनुषंगाने समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

दोषारोपसिध्दीचे प्रमाण वाढविण्याच्या दृष्टीकोनातून राज्यातील न्याय सहाय्यक वैज्ञानिक प्रयोगशाळा अत्याधुनिक व अधिक सक्षम करण्यासाठी प्रधान सचिव/सचिव (विशेष), गृह विभाग यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर समितीची संरचना पुढीलप्रमाणे राहील:-

| | | |
|---|---|---|
| १. | प्रधान सचिव/ सचिव (विशेष), गृह विभाग | -अध्यक्ष |
| २. | पोलीस महानिरीक्षक (गुन्हे अन्वेषण विभाग, गुन्हे) | - सदस्य |
| ३. | संचालक, न्याय सहाय्यक वैज्ञानिक प्रयोगशाळा, मुंबई | - सदस्य |
| ४. | पोलीस उप आयुक्त, गुन्हे, मुंबई | - सदस्य |
| ५. | संचालक, आय.आय.टी. यांचे प्रतिनिधी | - सदस्य |
| ६. | सह सचिव/उप सचिव (पोल-४) | - सदस्य सचिव |

३. सदर समितीची कार्यकक्षा पुढील प्रमाणे राहील:-

**अ.** राज्यातील सध्याच्या न्यायसहाय्यक वैज्ञानिक प्रयोगशाळा मधील उपलब्ध यंत्रसामग्री व मनुष्यबळाचा आढावा घेऊन त्रुटींच्या पुर्ततेबाबत शासनास शिफारस करणे.

**ब.** कायदयाच्या कसोटीवर टिकू शकणारे पुराव्यास शास्त्रोक्त जोड देण्याच्या अनुषंगाने आधुनिक उपकरणे व तंत्रज्ञान अवलंबण्याबाबत शासनास शिफारस करणे.

**क.** न्यायसहाय्यक वैज्ञानिक प्रयोगशाळांची आवश्यक संख्या व मनुष्यबळ निश्चित करुन शासनास शिफारस करणे.

**ड.** राज्यातील न्यायसहाय्यक प्रयोगशाळा सक्षम व आधिक कार्यक्षम करण्याच्या दृष्टीने आवश्यक उपाय योजनांचा प्रशासकिय व आर्थिक आराखडा शासनास सादर करणे.

**४.** उपरोक्त समिती सदर आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्यांत शासनास शिफारस करेल.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०१५०५१२१७१६१३८९२९ हा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatray Santaram Patil

Digitally signed by Dattatray Santaram Patil
DN: CN = Dattatray Santaram Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.05.13 12:48:07 +05'30'

**(द.सं.पाटील)**
**उप सचिव, गृह विभाग,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय मुंबई.
३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य
४. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन, मुंबई
५. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
६. प्रधान सचिव (अपील व सुरक्षा),गृह विभाग, मंत्रालय मुंबई.
७. प्रधान सचिव व विधी परामर्श, विधी व न्याय विभाग मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, विशेष, मंत्रालय, मुंबई
९. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई
१०. सर्व पोलीस आयुक्त
११. विशेष पोलीस महानिरीक्षक, सर्व परिक्षेत्र
१२. सर्व अपर पोलीस महासंचालक
१३. सर्व जिल्हाधिकारी
१४. सर्व प्रधान जिल्हा व सत्र न्यायाधीश
१५. सर्व पोलीस अधीक्षक
१६. संचालक, अभियोग, संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१७. संचालक, न्याय सहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा
१८. मा.राज्यमंत्री (शहरे) यांचे खाजगी सचिव
१९. मा.राज्यमंत्री (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव
२०. सह सचिव/उप सचिव (पोल-४)
२१. सर्व सह सचिव/उप सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
२२. सर्व कार्यासने, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
२३. निवडनस्ती